एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-२
**सीपीटीपी-२ च्या तुकडीच्या वित्तिय वर्ष सन २०१६-१७- मधील महाराष्ट्र व दिल्ली अभ्यास दौरा तसेच पुनर्विलोकन व उजळणी कार्यक्रमाकरीता वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांना अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०४१६/प्र.क्र.४६/१६/सीपीटीपी-ब (१८-ब)**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १७ मार्च, २०१७.

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : बीयुडी-२०१६/प्र.क्र.५२/२०१६/२५, दि. ६ एप्रिल, २०१६.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय टिआरएन ४१६/प्र.क्र.४६/१६/सीपीटीपी-ब, दिनांक १२ एप्रिल, २०१६.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०१६/प्र.क्र. ५२/२०१६/२५, दिनांक २२ एप्रिल, २०१६
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय टिआरएन ४१६/प्र.क्र.४६/१६/सीपीटीपी-ब, दिनांक ६ जून, २०१६.
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय टिआरएन ४१६/प्र.क्र.४६/१६/सीपीटीपी-ब, दिनांक २९ नोव्हेंबर, २०१६.
७) वरिष्ठ प्रशासन नि लेखाधिकारी वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे पत्र क्रमांक वनामती / अंदाजपत्रक/२०१६-२०१७/ दिल्ली अभ्यास दौरा/२०१७/२४८, दिनांक ३१.०१.२०१७.
८) शासन पत्र समक्रमांक दिनांक १७ फेब्रुवारी, २०१७.
९) वरिष्ठ प्रशासन नि लेखाधिकारी वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे पत्र जा.क्रमांक वनामती/सीपीटीपी-२/५१८/२०१७, दिनांक ०१ मार्च, २०१७.

**शासन निर्णय** :-

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २० जानेवारी,२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट अ व ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेला सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या खर्चासाठी वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **रु. २४६५.०० लाख (रुपये चोवीसशे पासष्ट लाख फक्त)** इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. त्यापैकी (२०७००८६२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर )अंतर्गत रु. ४,०३,३३,०००/-व (२०७००८६२) ३६, सहायक अनुदान (वेतन) अंतर्गत रु. ७,५०,०००/- अशा प्रकारे एकुण रु. ४,१०,८३,०००/- इतके अनुदान (अक्षरी रुपये चार कोटी दहा लक्ष त्र्याऐंशी हजार फक्त) इतके अनुदान संदर्भाधिन अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील परिपत्रकातील सूचनांनुसार सन २०१६-१७ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०१६ अखेर) आवश्यक असणारा योजनेतर अर्थसंकल्पीत निधी एकुण वार्षिक

तरतुदीच्या ८०% मर्यादेत वितरित करण्यासाठी संदर्भ क्र.४ येथील परिपत्रकान्वये नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आला आहे. संदर्भ क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये अनुदानाचा दुसरा टप्पा म्हणून ३१, सहायक अनुदानपोटी (वेतनेतर)रु. १,९२,५०,०००/- व ३६, सहायक अनुदानापोटी (वेतन) रु. ३,७५,०००/- असे एकुण रु.१,९६,२५,०००/-(अक्षरी रुपये एक कोटी शहाण्णव लाख पंचवीस हजार फक्त ) इतके अनुदान वितरीत करण्यात आले आहे. त्याचप्रमाणे संदर्भ क्रमांक ६ येथील शासन निर्णयान्वये अनुदानाचा तिसरा टप्पा म्हणून ३१, सहायक अनुदानपोटी (वेतनेतर)रु. ३४,०३,०००/- व ३६, सहायक अनुदानापोटी (वेतन) रु. ३,०५,०००/- असे एकुण रु.३७,०८,०००/-(अक्षरी रुपये सदतीस लाख आठ हजार फक्त ) इतके अनुदान वितरीत करण्यात आले आहे.

३. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेच्या उपरोक्त संदर्भाधिन अनुक्रमांक ७ येथील प्रस्तावानुसार महाराष्ट्र व दिल्ली अभ्यास दौरा व पुनर्विलोकन तसेच उजळणी कार्यक्रमाकरीता एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यकमासाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता मुख्य लेखाशिर्ष क्रमांक २०७०-इतर प्रशासकीय सेवा अंतर्गत (२०७००८६२) **३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या उपलेखाशिर्षाखली** उपलब्ध असलेल्या निधीतून **रु. १,९६,२६,०६४/-(अक्षरी रुपये एक कोटी शहाण्णव लक्ष सव्वीस हजार चौसष्ट फक्त) इतके अनुदान पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे** :-

१) वनामती या प्रशिक्षण संस्थेने दिल्ली व महाराष्ट्र भेटीच्या अनुषंगाने संदर्भाधिन अनुक्रमांक. ९ येथील शासनास सादर केलेल्या कार्यक्रमानुसार प्रशिक्षणार्थींना केंद्र व राज्य शासनाच्या विभागातील संबंधित महत्वाच्या अधिकाऱ्यासमवेत चर्चा /मार्गदर्शन उपलब्ध करुन द्यावे.

२) संसदीय संलग्नता उपयुक्त व्हावी यासाठी लोकसभा सचिवालय संसदीय अभ्यास व प्रशिक्षण विभाग, नवी दिल्ली यांची पूर्वपरवानगी घेवून संसदीय संलग्नता पूर्ण केलेली असावी.

३) दिल्ली व महाराष्ट्र अभ्यास दौऱ्याच्या अनुषंगाने संदर्भाधिन अनुक्रमांक ८ येथील शासन पत्र समक्रमांक दिनांक १७ फेब्रुवारी, २०१७ अन्वये दिलेल्या सूचनांची पूर्तता करण्यात यावी.

४) उपरोक्त सूचनांच्या अनुषंगाने वनामती, नागपूर या संस्थेने प्रस्तुत दिल्ली व महाराष्ट्र अभ्यास दौऱ्याचा अहवाल शासनास सादर करावा.

| अ.क्र. | प्रशिक्षण संस्थेचे नाव | उपशीर्ष | अर्थसंकल्पीत वितरण प्रणालीतून वितरीत करावयाची तरतूद (रु.) |
|---|---|---|---|
| १. | वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर (वनामती ) | (००)(११) वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८६२) ३१, सहायक अनुदान - (वेतनेतर) | रुपये १,९६,२६,०६४/- |
| | | **एकुण वितरीत करावयाचे अनुदान** | **रुपये १,९६,२६,०६४/-** |

४. वनामती, नागपूर या संस्थेने आर्थिक वर्ष सन २०१६-१७ मधील आपला खर्च वितरीत अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा.

५. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

६. वनामती, नागपूर या संस्थेने वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर व शासनाला सादर करावे.

७. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावे व सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना राहतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१८१५१०२९८५०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2017.03.18 15:11:49 +05'30'

**(अजित देशमुख)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल,( लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२,मुंबई,नागपूर
२. महालेखापाल,( लेखा परीक्षा /लेखा व हकदारी )महाराष्ट्र-१/२,मुंबई,नागपूर,
३ अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४ .संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर-४४० ०१०
५. वरिष्ठ प्रशासन व लेखाधिकारी, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर-४४० ०१० (२ जादा प्रतींसह),
६. सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८. उप कोषागार अधिकारी , नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्रमांक २५, मुंबई-३२.
११. निवड नस्ती, सीपीटीपी-ब.

*********